महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील डॉ. दिगंबर विठ्ठल दयाळ वैद्यकीय अधिकारी गट-अ यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः** मवैअ-२०१८/प्र.क्र.१३२/सेवा-३
दहावा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय,मुंबई- ४०० ००१.
तारीख: १९ जानेवारी,२०१९.

वाचा :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील डॉ. दिगंबर विठ्ठल दयाळ यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार "वैद्यकीय अधिकारी, गट-अ" पदावर दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीकरीता दि.२९/०५/१९९० रोजीच्या शासन निर्णयान्वये "वैद्यकीय अधिकारी, गट-अ" या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्ती करण्यात आलेली आहे.

२. डॉ. दिगंबर विठ्ठल दयाळ यांचा दि. २९/०५/१९९० रोजी सुरु झालेला परिविक्षाधीन कालावधी दि.२८.०५.१९९२ रोजी समाप्त झाला असता. तथापि, डॉ. दयाळ हे दि.०४.०३.१९९१ ते दि.०१.०४.१९९३ या एकूण ४५२ दिवसांच्या कालावधीत असाधारण रजेवर होते. त्यांची सदर कालावधीची असाधारण रजा दि.१०.०५.२०१८ च्या शासन ज्ञापनान्वये मंजूर करण्यात आली आहे. त्यामुळे दि.०२.०४.१९९३ पासून पुढे ४५२ दिवस कालावधी इतका त्यांचा परिविक्षा कालावधी पुढे ढकलणे आवश्यक आहे.

३. उक्त बाबी विचारात घेता तसेच, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून, महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील वैद्यकीय अधिकारी गट-अ या पदावर पदस्थापना दिलेले डॉ. दिगंबर विठ्ठल दयाळ यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता सदर परिच्छेदात नमूद तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील डॉ. दिगंबर विठ्ठल दयाळ "वैद्यकीय अधिकारी गट-अ" यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी या परिच्छेदातील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्र.५ मध्ये नमूद दिनांकास (म.नं.) समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक स्तंभ क्र.७ मध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ. क्र. | नाव | कार्यालय | वै.अ.पदावरील रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी पुढे ढकलल्याची कारणे | वै.अ.पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | डॉ. दिगंबर विठ्ठल दयाळ | प्रा आ केंद्र सायगाव जि सातारा | दि.२९.०५.१९९० | दि.२७.०६.१९९४ (दि.) | ४५२ दिवसांची असाधारण रजा (दि.०४.०३.१९९१ ते २८.०५.१९९२ या कालावधीसाठी एकूण ४५२ | दि.२८.०६.१९९४ |

| अ. क्र. | नाव | कार्यालय | वै.अ.पदावरील रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी पुढे ढकलल्याची कारणे | वै.अ.पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | दिवसांची असाधारण रजा परिविक्षा कालावधी पुढे ढकलण्यासाठी विचारात घेतला अहे) | |

२. आयुक्त, आरोग्य सेवा व कु.क.तथा अभियान संचालक, रा.आ.अ., मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर वैद्यकीय अधिकारी यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने नियमानुसार तात्काळ उचित कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/ आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११९१२०८३३१११७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2019.01.19 17:11:47 +05'30'

**(व. मुं. भरोसे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा व कु.क.तथा संचालक, रा.आ.अ, आरोग्य भवन,मुंबई.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर.
४. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य भवन, मुंबई
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ पुणे.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, सातारा.
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद सतारा.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
९. दिगंबर विठ्ठल दयाळ (दिवंगत), तत्कालीन वैद्यकीय अधिकारी, प्रा. आ. कें. सायगाव जि सातारा यांच्या पत्नीस उपसंचालक, आरोग्य सेवा पुणे मंडळ पुणे यांच्यामार्फत.
१०. डॉ. निवडनस्ती (कार्यासन, सेवा-३).